**शासकीय दूध योजनेमार्फत संघ/ संस्था यांना वरकड खर्चासाठी देण्यात येणाऱ्या कमिशनचे सुधारीत दर निश्चित करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**

कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्रमांकः एमएलके २०१३ /प्र.क्र. ९८/ पदुम ८
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०००३२
तारीख: २५ नोव्हेंबर, २०१४

वाचा

१) शासन निर्णय क्रमांकः कृषि व पदुम विभाग,क्रमांक एमएलके१००९/१०३७५/प्र.क्र.७१/पदुम८, दि १३.८.२००९
२) शासन निर्णय क्रमांक : कृषि व पदुम विभाग, क्रमांक एमएलके २०१३/प्र.क्र.९८/पदुम ८, दि. २१.११.२०१३

**प्रस्तावना**

राज्यातील दूध संकलनाची व दूध खरेदी दराची स्थिती पाहता शासनाकडे होणाऱ्या दूध संकलनात सातत्य व नियमितपणा रहावा यासाठी दूध खरेदी व विक्री दर व संघ / संस्था कमिशन दर निर्धारित करुन निर्णय घेण्यासाठी संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये मा.सचिव (पदुम) यांच्या अध्यक्षतेखाली प्रदत्त समितीची स्थापना करण्यात आलेली आहे.

दुधाच्या पृष्ठकाळातील नैसर्गिक वाढ तसेच सहकारी व खाजगी दुध भूकटी उत्पादकांनी दूध खरेदीत व कमिशन/वरकड खर्चात केलेली कपात यामुळे तसेच शासनातर्फे दूध उत्पादकांना देण्यात येणारे कमिशन दर हे जास्त असल्यामुळे इतर राज्यातील दूध उत्पादक महाराष्ट्रात दूध पुरविण्यासाठी आकर्षित होत आहे. त्यामुळे राज्यात अतिरिक्त दुधाचा प्रश्न निर्माण झाला आहे. सद्य:स्थितीत झालेली डिझेल दर कपात विचारात घेता, या परिस्थितीत दूध संकलन व वितरण यामध्ये नियोजन राखणे शक्य व्हावे यासाठी संघ/ संस्था यांना वरकड खर्चासाठी देण्यात येणाऱ्या कमिशन दरात कपात करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

शासनामार्फत दिनांक २१.११.२०१३ च्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आलेल्या संघ/संस्था कमिशनच्या दरात पुढीलप्रमाणे सुधारीत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | तपशिल | सध्याचे दर | सुधारीत दर |
|---|---|---|---|
| १ | अंतर्गत वाहतुक | १४० पैसे | ११० पैसे |
| २ | शितकरण आकार | ३५ पैसे | ३५ पैसे |
| ३ | व्यवस्थापन खर्च | ५५ पैसे | ३० पैसे |
| ४ | कॅन खर्च | ०५ पैसे | ०५ पैसे |
| ५ | संस्था कमिशन | १०० पैसे | ७० पैसे |
| | **एकूण :** | **३३५ पैसे** | **२५० पैसे** |

हे आदेश दि.२६.११.२०१४ पासून अंमलात येतील.

हे आदेश प्रदत्त समितीच्या दिनांक २१.११.२०१४ च्या बैठकीत शिफारस केल्यानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४११२५१३१७२५४३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sathe Shashank M

Digitally signed by Sathe Shashank M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sathe Shashank M
Date: 2014.11.25 13:25:52 +05'30'

**(श.मा.साठे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
३) मा.(सर्व) मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहायक
४) प्रधान सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई
५) सचिव (सहकार), मंत्रालय, मुंबई
६) आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई
७) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
८) आयुक्त, पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
९) सर्व विभागीय आयुक्त
१०) सर्व जिल्हाधिकारी
११) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ मर्या., गोरेगांव, मुंबई
१२) महाव्यवस्थापक, बृहन्मुंबई दूध योजना, वरळी, मुंबई ४००० १८
१३) प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, पुणे/ नागपूर / मुंबई / औरंगाबाद /नाशिक / अमरावती
१४) सर्व जिल्हा दुग्धविकास अधिकारी
१५) सर्व महाव्यवस्थापक / व्यवस्थापक, शासकीय दूध योजना
१६) महालेखापाल १ /२, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) मुंबई / नागपूर
१७) अधिदान व लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
१८) निवासी लेखा अधिकारी, मुंबई
१९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२०) वित्त विभाग (व्यय २)
२१) सर्व कार्यासने (पदुम विभाग)
२२) निवडनस्ती.